## प्रिय मुलांनो!

१९१७ सालाच्या घडामोडींमध्ये भाग घेणारे, ऑक्टोबर क्रांतीच्या मुख्य लष्करी कचेरीचे पहिले प्रमुख व्लादीमिर बोंच-ब्रूयेविच यांनी हे पुस्तक लिहिले आहे. मॉस्कोतील क्रांतीसंग्रहालयात काळजीपूर्वक जतन केलेली त्या दिवसांतील दस्तऐवजपर छायाचित्रे या पुस्तकात दाखविली आहेत. ऑक्टोबर क्रांती घडून ६० वर्षे होत आली. या काळात आर्थिकरीत्या अल्पविकसित मागासलेल्या रशियाचे आश्चर्यकारक रूपांतर घडून आले आहे. या छायाचित्रात जी मुले आहेत, त्यांना रशिया हा जगातील सर्वांत अग्रगण्य देश आहे हे माहीत आहे. ही मुले प्रचंड बांधकामांच्या आणि अंतराळामधील यश:सिद्धींच्या काळात रहात आहेत. ऑक्टोबर क्रांतीमध्ये भाग घेणारे जुने कम्युनिस्ट वासिली पेत्रोविच विनोग्रादोव त्या महान ऐतिहासिक दिवसांविषयी माहिती सांगण्यासाठी मुलांकडे आले आहेत. मुलांना त्यांची माहिती मनोरंजक वाटते.

В. БОНЧ-БРУЕВИЧ

**В ПЕРВЫЕ ДНИ ОКТЯБРЯ**

*на языке маратхи*

Перевод сделан по книге:
В. Бонч-Бруевич
В первые дни Октября.
М. «Дет. лит.», 1975



सोविएत संघात मुद्रित

Б $\frac{70802-735}{014(01)-79}$ 753-78

4803010102

व्लादीमिर दिमीत्रियेविच बाँच-ब्रूयेविच
(१८७३-१९५५)
सोविएत मुत्सद्दी आणि पक्षकार्यकर्ते,
व्लादीमिर इल्यिच लेनिन यांचे मित्र
आणि सहकारी

व्लादीमिर बाँच-ब्रूयेविच

# ऑक्टोबरचे पहिले दिवस

प्रगती प्रकाशन
मॉस्को

अनुवादः अनिल हवालदार
चित्रेः गेओर्गी यूदिन



आॅक्टोबर क्रांतीच्या पहिल्या दिवसांमध्ये पेत्रोग्रादचे वातावरण अपेक्षांनी शिगोशीग भरलेले होते. प्रत्येकजण कशाची तरी वाट पहात होता. स्मोल्नीमध्ये एकच गर्दी उडाली होती, कारण तेथे बोल्शेविकांचे प्रमुख ठाणे होते. क्रांतिकारक लष्करी समितीची बैठक तेथेच भरत होती. व्लादीमिर इल्यिच लेनिनही याच ठिकाणी होते. त्यांचा सल्ला घ्यायला येणाऱ्या लोकांचे ते स्वागत करीत होते, त्या दिवसाच्या घडामोडींची विचारणा करीत होते. स्मोल्नीपासून फार दूर नसलेल्या हेमंत प्रासादामध्ये आणि त्या प्रासादाकडे जाणाऱ्या मार्गांवर काय घडते आहे याची ते विशेषत्वाने चौकशी करीत होते.

व्लादीमिर इल्यिच स्मोल्नीमध्ये आहेत ही बातमी लौकरच बोल्शेविकांमध्ये वाऱ्यासारखी पसरली. अनेकजणांना त्यांना पहायची इच्छा होती आणि म्हणून ते स्मोल्नीकडे धाव घेत होते. ज्या लोकांचे तिथे प्रत्यक्ष काही काम नव्हते अशी माणसेही डोकावून जात होती. लेनिन यांच्या कचेरीत प्रवेश मिळावा म्हणून वर्तमानपत्रांमधले लोक आणि विशेषत: परदेशी वार्ताहर धडपड करीत होते.

त्या खोलीवर लोकांची रीघ केंद्रित झाल्याचे बहुधा त्यांच्या लक्षात आले होते आणि उठावाचे क्रियाशील केंद्र तेथेच असल्याचे समजून आले होते.

खात्रीशीर पहारा बसविण्याची गरज होती. स्मोल्नीतल्या एका दालनात पाचशेपेक्षा अधिक सशस्त्र कामगार बसलेले होते. ते लाल रक्षक होते.

त्यांच्यापैकी सुमारे पंचाहत्तर लोकांवर स्मोल्नीच्या रक्षणाची जबाबदारी टाकण्याचे ठरविण्यात आले.





एका तरुण, रुबाबदार, कुरळ्या केसाच्या तिशीतल्या कामगाराने त्या लोकांना एका रांगेत उभे राहण्याचा हुकूम दिला.

क्षणार्धात ते सर्व हुश्शार पवित्र्यात उभे झाले. एकदम निःस्तब्धता पसरली. दोन रक्षक दाराशी उभे राहिले. मुख्य अधिकाऱ्याने नंतर सांगितले की, पंचाहत्तर स्वयं-सेवकांची गरज आहे आणि त्यांच्यावर फार मोठी जोखमीची कामगिरी पडेल. कदाचित त्यांना मृत्यूला सामोरे जावे लागेल.

त्यासरशी सबंध तुकडी थाडदिशी एक पाऊल पुढे आली आणि पुन्हा हुश्शार पवित्र्यात उभी राहिली. मुख्य अधिकाऱ्याने पंचाहत्तर लोकांची निवड केली, त्यांचा एक नेता व दोन प्रतिनिधी यांची नेमणूक केली.

"जर काही घडलं..." तो कठोरपणे म्हणाला आणि गप्प झाला.

त्यांनी पहिली गोष्ट कोणती केली तर ती म्हणजे परवाने वाटण्याची. पहिल्या क्रमांकाचा परवाना व्लादीमिर इल्यिच यांना मिळाला.

"हे काय? परवाना? कशासाठी?" त्यांनी विचारले.

"तुम्हाला आवश्यक आहे. वेळ प्रसंगी उपयोगी पडेल. आम्ही स्मोल्नीवर पहारा बसवलाय. चला आमच्याबरोबर आणि जरा नजर टाका."

व्लादीमिर इल्यिच दारापाशी गेले आणि त्यांनी दृष्टी बाहेर फेकली. तुकडी एका रांगेत हुश्शार पवित्र्यात उभी असल्याचे त्यांनी पाहिले.

"किती छान तरुण माणसं आहेत! त्यांच्याकडं पाहिलं म्हणजे मनाला आनंद वाटतो!" ते म्हणाले.

प्रवेशद्वाराच्या बाहेर आणि खोलीच्या दाराच्या आतल्या अंगास रक्षक उभे राहिले.

मध्यवर्ती तुकडीशी मुख्य अधिकाऱ्याने ताबडतोब संपर्क साधला.

स्मोल्नीमध्ये लोकांची सतत रीघ लागली होती.

* * *

हंगामी सरकारचे रक्षण करणारे कॅडेट हेमंत प्रासादात ठाण मांडून बसले होते आणि प्रासादाला घातलेला वेढा लांबत चालला होता, ह्या वस्तुस्थितीने व्लादीमिर इल्यिच सर्वांत अधिक चिंताक्रांत झाले होते.

पावलोव्स्की रक्षक तुकडी क्रांतिकारक फौजांच्या बाजूला येऊन मिळाली होती. हेमंत प्रासादाकडे जाणाऱ्या मार्गांवर मोर्चे धरून बसण्याचा तिला हुकूम देण्यात आला होता.

त्या तुकडीने प्रासादाला वेढा घातला.

क्रांतिकारक खलाशांची कुमक आली आणि प्रासादापुढील चौकातून त्यांचे लोंढे घुसले. हेमंत प्रासादाकडे जाणाऱ्या वाटा त्यांनी रोखल्या. हेमंत प्रासादावरच्या हल्ल्याला आरंभ झाला होता. अनेक तासपर्यंत तुंबळ लढाई चालली होती.

पावलोव्स्क तुकडीच्या सैनिकांना आणि लाल रक्षकांना सांगाती घेऊन खलाशांनी प्रासादाच्या प्रचंड प्रवेशद्वारांवर हल्ला चढवला व त्यांना बळाने उघडून प्रासादाच्या तळमजल्यावरील आवारात ते घुसले.

'आव्रोरा' युद्धनौका नेवा नदीत नांगरून पडली होती. तिच्यावरच्या तोफा प्रासादाच्या



दिशेने रोखलेल्या होत्या. दुसऱ्या तीरावरच्या पेत्रोपावलोव्स्क गढीतल्या गोलंदाजांना तसेच हुकूम मिळाले होते.

'आव्रोरा' वरील आणि पेत्रोपावलोव्स्क गढीतील तोफांनी हेमंत प्रासादावरील तुफानी हल्ल्याचा आरंभ केला. राजवाड्याच्या जिन्यांचा आणि आत-बाहेर जाणाऱ्या मार्गांचा, असा मोक्याच्या जागांचा लाल रक्षकांनी, खलाशांनी आणि सैनिकांनी ताबा घेतला. २५ ऑक्टोबरच्या रात्री बोल्शेविक फौजांनी हेमंत प्रासादाचा कबजा केला. हंगामी सरकारला अटक करून कडक पहाऱ्यात पेत्रोपावलोव्स्क गढीत नेण्यात आले.

हंगामी सरकारचे प्रमुख केरेन्स्की हे बाईचा वेष घेऊन गुप्त मार्गाने हळूच पसार झाले आणि अमेरिकेच्या वकिलातीने पुरविलेल्या मोटारीतून त्यांनी पलायन केले.

* * *

काळे कातडी जाकीट आणि तंग तुमान चढवलेल्या एका सैनिकाने चिलखती गाडीमधून खाली उडी घेतली व तो व्हरांड्यामधून घाईघाईने गेला. त्याच्या खांद्यावर खलित्यांची थैली लटकत होती व ती खाली घसरत असताना तो डाव्या हाताने सतत सावरत होता.

"क्रांतिकारक लष्करी समितीचं मुख्य ठाणं कुठं आहे?" दाराबाहेर पहारा देणाऱ्या दोन लाल रक्षकांना उद्देशून त्याने विचारले.

"कुणाला भेटायचंय?"

"लेनिनना! त्यांच्यासाठी खलिता आहे!"

त्या रक्षकांपैकी एकजण वळून दुसऱ्याला म्हणाला, "हा निरोप्या आहे. आणि याच्याजवळ





परवाना नाही. लेनिनना भेटायला हा मुख्य ठाण्यावर आलाय. आपल्याला पहाऱ्याच्या नाईकांना बोलावलं पाहिजे."

पहाऱ्यावरचे नाईक आले आणि तो निरोप्या कोठून आला आहे याची त्यांनी चौकशी केली.

"हेमंत प्रासादामधून. सरसेनापती पदवोयस्की यांच्याकडून."

"चला जाऊ या."

"मी खलिता घेऊन आलोय. मला तो लेनिन यांच्या हाती द्यायचा आहे," शेजारच्या खोलीत प्रवेश करीत असताना तो सैनिक म्हणाला.

व्लादीमिर इल्यिच त्याच्यापाशी आले. "हूं, काय काम आहे कॉम्रेड?"

"आपणच लेनिन काय?" आपल्या चेहऱ्यावरचे कुतूहल लपविण्याचा अजिबात प्रयत्न न करता तो सैनिक टक लावून व्लादीमिर इल्यिच यांच्याकडे पहात राहिला. त्याच्या डोळ्यांत चमक आली. त्याने घाईघाईने आपल्या थैलीचे तोंड उघडले, एक कागदाचा ताव हाती घेतला आणि व्लादीमिर इल्यिच यांना काळजीपूर्वक दिला. मग त्याने सलाम ठोकला आणि तो म्हणाला: "हा खलिता आहे!"

लेनिननी त्याचे आभार मानले व हस्तांदोलनासाठी आपला हात त्याच्यापुढे धरला. त्या सैनिकाने अत्यंत अवघडून, आपल्या दोन्ही हातांमध्ये लेनिन यांचा हात पकडून कसेबसे हस्तांदोलन केले. त्याने स्मित केले, पुन्हा सलाम ठोकला, आपल्या टाचांवर जोरात गिरकी घेतली व रुबाबदार पावले टाकीत तो निघून गेला. खलिता मिळाल्याचा

लेनिन यांच्या सहीचा पावतीचा कागद जाता जाता त्याने ऐटीत आपल्या थैलीत टाकला.

व्लादीमिर इल्यिचनी खलिता मोठ्या आवाजात जलद वाचला: "हेमंत प्रासाद काबीज केला. हंगामी सरकारला अटक झाली. केरेन्स्की निसटले!"

त्यांचे वाचून होते न होते तोच आनंदाच्या आरोळ्या उमटल्या. या आरोळ्यांचा अर्थ शेजारच्या खोलीमधल्या लाल रक्षकांच्या ध्यानात ताबडतोब आला.

लौकरच सर्व खोल्यांमधून आणि व्हरांड्यांमधून हर्षभरीत आरोळ्या ऐकू येऊ लागल्या.

अखेरीस स्मोल्नीमधून बाहेर पडायला आम्हाला पहाटेचे चार वाजले. आम्ही सारे थकलो होतो, तरी कमालीचे उत्तेजित होतो. व्लादीमिर इल्यिचना मी माझ्या घरी झोपायला बोलावले. सावधगिरी म्हणून राझ्देस्त्वेन्स्की विभागातल्या सशस्त्र कामगार तुकडीला मी फोन केला व रस्त्यांवर टेहळणी करून सर्व काही आलबेल असल्याची खात्री करायला सांगितले.

आम्ही स्मोल्नीमधून बाहेर पडलो. सबंध शहर अंधारात बुडाले होते. आम्ही मोटारीत बसलो आणि माझ्या घराच्या दिशेने निघालो.

व्लादीमिर इल्यिच कमालीचे थकलेले दिसत होते. यांना मोटारीत बसल्या बसल्या डुलकी लागली. आम्ही भरपूर जेवलो. व्लादीमिर इल्यिच यांना जास्तीत जास्त आराम मिळावा म्हणून मी प्रयत्न करीत होतो. माझ्या छोट्या अभ्यासिकेत माझ्या बिछान्यावर त्यांनी झोपावे म्हणून त्यांची खूप मनधरणी करावी लागली. त्या ठिकाणी मेज, लेखणी, शाईची दौत आणि माझे ग्रंथालय त्यांच्या दिमतीला होते. अखेरीस ते कबूल झाले आणि आम्ही रात्रीपुरता एकमेकांचा निरोप घेतला.

मी शेजारच्याच खोलीत एका कोचावर पडलो. व्लादीमिर इल्यिच यांना झोप लागेपर्यंत जागे रहायचा मी निश्चय केला होता.

सर्व काही सुरक्षित आहे किंवा नाही याची पक्की खात्री करून घेण्यासाठी मी पुढच्या दाराला कडी, कुलूप, साखळी घातली व माझ्या पिस्तुलांमध्ये काडतुसे भरून ठेवली. जर कुणी घर फोडून आत यायचा प्रयत्न केला आणि व्लादीमिर इल्यिच यांना पकडण्याचा अगर ठार करण्याचा प्रयत्न केला तर प्रतिकाराला माझी जय्यत तयारी असणे आवश्यक होते. काहीही घडणे शक्य होते.

प्रसंगी उपयोगी पडावे म्हणून मी कागदाचा एक कपटा घेऊन त्यावर मला माहीत असलेल्या आमच्या वेगवेगळ्या कॉम्रेड मंडळींचे, स्मोल्नीचे, विभागीय कामगार समितीचे आणि ट्रेड युनियनांचे टेलिफोन क्रमांक लिहून काढले. "आणीबाणीच्या वेळी विस्मरण व्हायला नको" असे मी स्वत:ला बजावले.

व्लादीमिर इल्यिचनी आपला दिवा मालवला. मी कान देऊन ऐकले,

# КЪ ГРАЖДАНАМЪ РОССИИ!

Временное правительство низложено. Дѣло, за которое боролся народъ: немедленное предложение демократическаго мира, отмѣна помѣщичьей собственности на землю, рабочий контроль надъ производствомъ, создание Совѣтскаго правительства — это дѣло обезпечено.

Да здравствуетъ революция рабочихъ, солдатъ и крестьянъ!

Хлѣбъ — голоднымъ!

Землю — крестьянамъ!

Заводы — рабочимъ!

Миръ — народамъ!

Военно-Революционный Комитетъ при Петроградскомъ Совѣтѣ Рабочихъ и Солдатскихъ Депутатов 25 октября 1917 г. 10 ч. утра.

КЪ ГРАЖДАНАМЪ РОССИИ!
Временное
которое борол
демократическа
ственности на
производствомъ
ства — это дѣ
революция ра
Хлѣб —
З
Военн
при П
Рабо
25

पण त्यांच्या खोलीतून कसलाच आवाज ऐकू येत नव्हता. अखेरीस मला डुलकी लागत होती तेवढ्यात त्यांच्या दाराखालच्या फटीतून एकदम प्रकाश चमकलेला मला दिसला.

मला तात्काळ जाग आली. बिछान्यावरून ते हळूच उठल्याचा आवाज मी ऐकला. माझ्या खोलीचे दार त्यांनी सावधपूर्वक उघडले आणि मी गाढ झोपलो आहे याची खात्री करून घेतली. मग ते अभ्यासिकेतल्या मेजापाशी चोरपावलांनी गेले, तेथे बसून दौतीचे झाकण उघडले, काही कागदांची चळत पुढ्यात पसरली आणि कामाला लागले. दाराला त्यांनी ठेवलेल्या फटीमधून मी हे सारे पाहू शकत होतो.

व्लादीमिर इल्यिच लिहीत होते. मग त्यांनी काहीतरी खोडून टाकले, जे लिहिले होते ते वाचून काढले, टिपणे केली, पुन्हा लिहिले आणि अखेरीस त्यांनी जे काही लिहिले होते त्याची बहुधा स्वच्छ नक्कल उतरवून काढली.

पहाट फुटत होती. शरद ऋतूच्या अखेरीची ती पेत्रोग्रादमधली धूसर सकाळ उजाडत होती आणि अशा वेळी अखेरीस व्लादीमिर इल्यिचनी दिवा मालवला, ते बिछान्यावर जाऊन पडले व झोपी गेले. मीही झोपलो.

त्या सकाळी आमच्या घरातल्या माणसांना मी गप्प राहण्याची सूचना दिली होती, कारण व्लादीमिर इल्यिच सबंध रात्रभर काम करीत असल्याने ते थकलेले असणे स्वाभाविक होते.

एकाएकी दरवाजा उघडला आणि पूर्ण पोषाख करून,

ताज्या टवटवीत मुद्रेने ते बाहेर आले. त्यांची चर्या जोमदार आणि उल्हसित दिसत होती.

"समाजसत्तावादी क्रांतीच्या पहिल्या दिवशी मी तुम्हाला शुभेच्छा देतो!" ते म्हणाले.

त्यांच्या चेहऱ्यावर थकव्याचा मागमूस नव्हता. एखाद्याला वाटले असते की, त्यांना रात्रभर अगदी गाढ झोप मिळालेली असावी. पण प्रत्यक्षात मात्र अत्यंत कठीण अशा वीस तासांच्या परिश्रमांनंतर त्यांना जेमतेम दोन-तीन तासच झोप मिळाली होती.

काही कॉम्रेड आले. माझ्याच घरी रात्र घालवलेल्या नदेज्दा कॉन्स्तन्तिनोव्‌ना जेव्हा आम्हा सर्वांबरोबर न्याहरीच्या मेजाशी येऊन बसल्या तेव्हा व्लादीमिर इल्यिचनी आपल्या खिशामधून काही कागद बाहेर काढले आणि त्या निर्णायक दिवसांमध्ये त्यांनी तयार केलेला सुप्रसिद्ध जमीनविषयक हुकूमनामा आम्हाला वाचून दाखवला. आम्ही नंतर लौकरच स्मोल्नीकडे पायी जायला निघालो. मग वाटेत एका ट्राममध्ये चढलो. रस्त्यांवर सुविहीत शांतता नांदताना पाहून व्लादीमिर इल्यिचना आनंद झाला.

त्या सायंकाळी, सोविएतांच्या दुसऱ्या अखिल-रशिया काँग्रेसमध्ये शांततेच्या हुकूमनाम्यावर संमतीचे शिक्कामोर्तब झाल्यानंतर, व्लादीमिर इल्यिच यांनी जमीनविषयक हुकूमनामा वाचला. वाचताना ते प्रत्येक शब्दावर जोर देऊन स्पष्टपणे वाचत होते. त्या हुकूमनाम्याला काँग्रेसने अत्यंत हर्षपूर्वक, एकमताने मंजुरी दिली.



